GR - 20040730153845001 - 1201

महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ अन्वये जिल्हा परिषदांना देण्यात येणा-या ७ % वन महसूल अनुदानातून करावयाचा खर्च

अनुदान विनियोगाची मार्गदर्शक तत्वे.

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्रमांक -एफआरजी-२००३/प्र.क्र.८२१४/वित्त-३ (२४)

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक :- ८ जानेवारी,२००४

वाचा- शासन निर्णय क्रमांक एफआरजी-१०९३/सीआर २८२६/२४ दिनांक १२ नोव्हेंबर १९९३

प्रस्तावना:-

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१मधील कलम १८१(अ) नुसार जिल्हा परिषदांना देण्यात येणा-या ७% वन महसूल अनुदानाच्या विनियोगाची एकत्रित मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आलेली आहेत.

तथापि या व्यतिरिक्त इतर कोणती योजना घ्यावयाची झाल्यास त्यासाठी प्रत्येक वेळी शासनाची मंजुरी घेणे आवश्यक ठरते. बदलत्या परिस्थितीनुसार आदिवासी क्षेत्रातील लोकांसाठी वेगवेगळ्या नवीन योजना राबविण्याचे जिल्हा परिषदा प्रस्तावित करतात. जिल्हा परिषदांना प्रत्येक वेळी नवीन योजना राबविण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव सादर करण्याची आवश्यकता भासू नये व योजना राबविण्यास होणारा विलंब टाळावा म्हणून ७% वन महसूल अनुदानाच्या विनियोगाच्या मार्गदर्शक तत्वांमध्ये सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:-

घटनेच्या ७३ व्या घटनादुरुस्तीनुसार जिल्हा परिषदांना आर्थिक दृष्ट्या बळकट करणे व जास्तीत जास्त स्वायत्तता देणे अभिप्रेत असल्याने ७ % वन महसूल अनुदानामधून, जंगल क्षेत्रामधील आदिवासींच्या विकासाकरिता आवश्यक वाटतील अशा योजना राबविण्याचे ,जिल्हा परिषदांना संपूर्ण अधिकार देण्यात येत आहेत.तथापि या विषयावर दि.१२ नोव्हेंबर १९९३ अन्वये काढलेल्या शासन निर्णयातील (१) स्थायी समिती (२)वार्षिक कृती कार्यक्रम आराखडा (३) वार्षिक आराखडा तयार करणे , राबविणे व त्यासाठी पाळावयाचे वेळापत्रक कायम राहील आणि त्यास अनुसरुन कार्यवाही करणे आवश्यक राहील.

२) जिल्हा परिषदांना प्राप्त होणा-या ७ टक्के वन महसूल अनुदानाचा विनियोग जिल्हा परिषदांनी त्यांच्या अधिपत्याखालील जंगल क्षेत्रामध्ये करावयाचा आहे. जंगल क्षेत्रामधील आदिवासींच्या उन्नतीसाठी, जंगलक्षेत्राच्या विकासासाठी असणा-या योजनांसाठी खर्च करावयाचा आहे

३. या अनुदानातून घ्यावयाच्या विकास कामांपैकी ज्या कामांना वन क्षेत्राचा उपयोग आवश्यक ठरणार आहे, तेथे केंद्र शासनाच्या वनसंवर्धन अधिनियम, १९८० च्या अधीन

करून कार्यवाही करण्यात यावी. या अधिनियमातील तरतूदीनुसार कोणत्याही वनजमिनीचा वनेतर वापर करावयाचा असल्यास त्यासाठी केंद्र शासनाची पूर्वअनुमती घेणे आवश्यक आहे.

४. शासनाकडून जिल्हा परिषदांना जे ७ टक्के वन महसूल अनुदान दिले जाते, ते अनुदान ज्यावर्षी प्राप्त झाले, त्यावर्षी जिल्हा परिषदांनी जास्तीत जास्त प्रमाणात खर्च करावे, असे शासनास अपेक्षित आहे. तथापि, जिल्हा परिषदांकडून सदर अनुदानाचा पूर्णपणे विनियोग होत नाही. पर्यायाने अनुदान अखर्चित रहाते, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अशा प्रकारे ७ % वन महसूल अनुदान अखर्चित राहिल्यामुळे शासनाचा मूळ उद्देश सफल होत नाही. यास्तव प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे सर्व जिल्हा परिषदांना पुनश्च सूचना देण्यात येत आहेत की, जिल्हा परिषदांनी त्यांना प्राप्त होणा-या ७% वन महसूल अनुदानाचा खर्च ज्या वर्षात अनुदान प्राप्त झाले आहे, शक्यतो त्याच वर्षात करण्याचा प्रयत्न करावा. जेणे करून अनुदान अखर्चित रहाणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(जयश्री चौधरी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) सर्व विभागीय आयुक्त
२) प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
४) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद सर्व
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
६) समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
७) सर्व विभागीय वन अधिकारी
८) संचालक, शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना कोकण भवन, नवी मुंबई
१०) संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) महसूल व वन विभाग, क-१, मंत्रालय, मुंबई ३२
१२) शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१३) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
१६) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१७) उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, बेलापूर, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
१८) कार्यासन अधिकारी, ३८, (वित्त-८) ग्राम विकास विभाग
१९) निवड नस्ती, का.क्र.२४, ग्राम विकास विभाग.